**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली २०१८/प्र.क्र. २९/१४ अ.**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०००३२
तारीख: ०३ ऑक्टोबर, २०१८

संदर्भ:- १) सामान्य प्रशासन विभागाचे शासन आदेश समक्रमांक दिनांक २८-०८-२०१८.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१४, दिनांक ०९-०८-२०१६
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/१४, दिनांक २३-१२-२०१६

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) नुसार व मा. मुख्यमंत्र्यांच्या मान्यतेने मंत्रालयीन सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या समक्रमांकाचे दिनांक २८-०८-२०१८ च्या आदेशान्वये मंत्रालयीन विभागात बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या आहेत. सदर आदेशातील सहायक कक्ष अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावयाचे होते. तथापि, त्यांच्या सध्याच्या विभागामधून **बदली झालेल्या विभागात रुजू होण्यासाठी अद्याप खाली नमूद सहायक कक्ष अधिकाऱ्यांना कार्यमुक्त करण्यात आलेले नाही**. आता संदर्भाधिन क्रमांक २ व ३ येथील शासन परिपत्रक व शासन निर्णयातील तरतूदीनुसार या आदेशान्वये त्यांना दिनांक ०३-१०-२०१८ (म.नं.) रोजी एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. खालील कर्मचाऱ्यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता त्यांच्या नावासमोर **रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे**. :-

| अ.क्र. | श्री/ श्रीमती | सहायक कक्ष अधिकाऱ्याचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | प्र.म.तवटे | उद्योग ऊर्जा व कामगार विभाग | विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग |

२. संबंधित सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता त्यांच्या नावासमोर **रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू व्हावे.**

३. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ चे नियम १२ मधील तरतुदीनुसार उपरोक्त तक्त्यात नमूद सहायक कक्ष अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नसल्याने, ते जर त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू झाले नाहीत तर, त्यांच्या अनुपस्थितीचा कालावधी सेवाखंड धरण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००३१६५००७१७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2018.10.03 16:55:49 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित सहायक कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२. अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई - ४०० ०३२. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

३. सह / उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

४. निवडनस्ती.